नगरपरिषद/ नगरपंचायत मुख्य अधिकाऱ्यांनी
त्यांच्या मुख्यालयात उपस्थित राहण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : एमसीओ २०१५/प्र.क्र. ३०९/नवि १४
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई-४०० ०३२.
दि.१५ ऑक्टोबर, २०१५

वाचा :- सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.सीडीआर-१३००/प्र.क्र.९/००/११,
दि.१७.०८.२०००.

परिपत्रक :-

१. शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांनी सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्व परवानगी शिवाय मुख्यालय न सोडण्याबाबत शासनाचे स्थायी आदेश आहेत. या संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त दि.१७.०८.२००० च्या परिपत्रकान्वये विना अनुमती मुख्यालयात गैरहजर राहणाऱ्या अधिकारी/ कर्मचाऱ्याबाबत करावयाच्या कार्यवाही संदर्भात सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. सन २०११ च्या जनगणनेनुसार राज्यातील नागरी लोकसंख्येचे प्रमाण ५०% च्या जवळपास आहे. राज्यात २६ महानगरपालिका व ३३६ नगरपरिषदा / नगरपंचायती अशा एकूण ३६२ नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आहेत. नागरी क्षेत्रातील नागरीकांच्या दैनंदिन गरजा या नागरी स्थांनिक संस्थाशी निगडीत असतात. राज्यातील पात्र व्यक्तींना पारदर्शक, कार्यक्षम व समायोजित लोकसेवा देण्याकरीता तसेच लोकांच्या स्थानिक प्रशासनाकडुन वाढत्या अपेक्षा विचारात घेऊन त्यांना तत्पर व दर्जेदार सेवा पुरविण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५ हा दि. २८.०४.२०१५ रोजी लागू करण्यात आला आहे.

३. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ७५ अनुसार प्रत्येक नगरपरिषद/ नगरपंचायतीसाठी मुख्य अधिकारी नेमण्याची तरतूद आहे. मुख्य अधिकारी हा संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा प्रशासकीय प्रमुख असतो.

४. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यक्षेत्रातील नागरींकांचा जीवनावश्यक व दैनंदिन स्वरुपाच्या कामाच्या निमित्ताने संबंधीत नागरी स्थानिक संस्थेशी सातत्याने संबंध येत असतो. या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा प्रमुख या नात्याने नागरीकांच्या समस्याचे वेळीच निराकरण करणे व नागरी प्रशासन सुव्यवस्थित राखणे आवश्यक असते. यासाठी संबंधीत मुख्य अधिकारी यांनी नियुक्ती दिलेल्या नगरपरिषदा/ नगरपंचायतीच्या मुख्यालयाच्या ठिकाणीच वास्तव्य करणे अनिवार्य आहे. तसेच, विनापरवानगी मुख्यालय सोडणे अनुचित आहे.

५. राज्यातील नागरीकरणाचा वाढता वेग, नागरी समस्यांचे शहरागणिक बदलते स्वरुप, सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापनाचे आव्हान इ. बाबी विचारात घेता नागरी प्रशासनाची बळकट व्यवस्था निर्माण करणे अपरिहार्य झाले आहे. त्याचप्रमाणे नागरी भागांसाठी केंद्र शासनाने ज्या महत्त्वाकांक्षी योजना प्रस्तावित केल्या आहेत त्यांच्या यशस्वी व प्रभावी अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. तद्नुषंगाने शासनाच्या उपरोक्त मुख्यालय न सोडण्याबाबतच्या आदेशाचे कसोशीने पालन होणे आवश्यक आहे.

६. उपरोक्तप्रमाणे आदेश असले तरी, शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, बऱ्याचवेळा मुख्याधिकारी हे मुख्यालयात हजर नसतात. त्यामुळे नागरीकांना संबंधीत मुख्य अधिकाऱ्याची भेट न मिळाल्याने त्यांच्या वेळेचा अपव्यय होतो तसेच, स्थानिक समस्याचे निराकरण होत नाही. सदर बाब गंभीर आहे.

७. उपरोक्त पार्श्वभूमिवर आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई, सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक व सर्व जिल्हाधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभागाचे उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत मुख्य अधिकारी यांच्या निदर्शनास आणून द्यावे व संबंधीत आदेशांचे काटेकोरपणे पालन होईल हे पहावे. त्याचप्रमाणे सदर परिपत्रकात नमूद केल्यानुसार यामध्ये कसूर करणाऱ्या अधिकाऱ्याविरुध्द नियमानुसार आवश्यक शिस्तभंगविषयक कार्यवाही करावी व आवश्यकतेनुसार त्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

८. जे मुख्य अधिकारी पूर्वपरवानगीशिवाय मुख्यालय सोडतात असे निदर्शनास आले किंवा जिल्हाधिकारी यांनी तसा अहवाल सादर केला तर संबंधित मुख्य अधिकाऱ्यांवर शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

९. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५१०१४१७२६५८३७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.10.15 17:43:35 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (नवि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
५. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
६. सर्व जिल्हाधिकारी
७. सर्व अध्यक्ष, नगरपरिषद/ नगरपंचायत
८. सर्व मुख्य अधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत
९. सर्व सह सचिव/उप सचिव नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
११. सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती/ नवि १४